**शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर या संस्थेतील इमारत दुरुस्ती व नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.प्रशामा-२०२५/प्र.क्र.६२/ई- १०१४१५५ /मशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २५ मार्च,२०२५

**संदर्भ**:- १) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अर्थसं- २०२५/(३६/२५) /E-८९२७८३/प्रशामा /लेखा-२, दिनांक २४.०२.२०२५

**प्रस्तावना** :-

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भिय १) येथील दिनांक २४.०२.२०२५ रोजीच्या पत्रान्वये शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयातील वसतिगृह परीसरामध्ये मोठ्या प्रमाणात गवत वाढल्यामुळे सापाचे वास्तव्य वाढलेले आहे. त्यामुळे मुलांच्या जिवितास धोका निर्माण होत आहे. हे टाळण्यासाठी वसतिगृह परिसरामध्ये पेव्हर ब्लॉक बसविणे आवश्यक आहे. तसेच इमारतीच्या खिडक्यांच्या काचा फुटलेल्या आहेत त्या दुरुस्ती करणे, बोअरवेलच्या पाण्याची पातळी वाढविण्यासाठी इमारतीचे रेन हॉर्वेस्टिग करणे इ. कामे करण्याबाबत सुचित करण्यात आलेले आहे. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर यांनी महाविद्यालयातील विविध दुरुस्ती व नुतणीकरणाची कामे प्रस्तावित केलेले आहे.

सदर कामाबाबत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्याकडील खर्चाची अंदाजपत्रके सादर करण्यात आली असून प्रस्तूत कामास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, छत्रपती संभाजीनगर यांनी तांत्रिक सहमती प्रदान केली आहे. यास अनुसरुन सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयातील इमारत दुरुस्ती व नुतणीकरणाच्या कामाकरीता खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण **रु.४२,१८,०२६ /- (रु. बेचाळीस लक्ष अठरा हजार सवीस रुपये फक्त)** इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर

| Sr No | Name of Work | Estimated Cost |
|---|---|---|
| ०१ | Providing and fixing paver block Surrounding to main building and water proofing of terrace of Govt Collage of Education (IASE) Chhatrapati Sambhajinagar (Boys Hostel) | ४२,१८,०२६ |
| **Rs. Forty Two Lakh Eighteen Thousand and Twenty six Only** | | **४२,१८,०२६** |

**२. <u>अटी</u>** :-

१) स्थापत्य कामाच्या पूर्ततेच्या कालावधीतच ढोबळ स्वरुपात गृहीत धरण्यात आलेल्या अनुषंगिक तरतूदींबाबत योग्य नियोजन करुन सविस्तर अंदाजपत्रकानुसारच पुढील कार्यवाही करुन काम हाती घ्यावे.

२) काम सुरु करण्यापूर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता तसेच उपभोक्ता खात्याचे सक्षम अधिकारी यांच्याकडून साक्षांकित करण्यात यावे.

३) सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय,क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७ / तां.क्र.१,दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७ नुसार प्रस्तुत कामाशी संबंधीत मुद्यांची कार्यवाही करावी.

६) प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय बांधकाम हाती घेण्यात येऊ नये.

**३.** या कामासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८,४२०२ शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यांवरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण, (००)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२०२ ००७९), ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

**४.** हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक २०/०९/२०१९ चे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-पाच

महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील अ.क्र.३, परिच्छेद क्रमांक १३४(३) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३२५१२२३०२२००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.03.25 12:23:45 +05'30'

**(अशोक मांडे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
८. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर
११. प्राचार्य, शासकीय अध्यापक महाविद्यालय, छत्रपती संभाजीनगर
१२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, छत्रपती संभाजीनगर
१४. वित्त विभाग, व्यय-५, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. नियोजन विभाग, कार्यासन-१४७१, मंत्रालय, मुंबई-३२
१६. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-इमा-३, मंत्रालय,मुंबई-३२
१७. अवर सचिव (साशि-१/मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८. निवडनस्ती